कै.श्री.शंकरराव संकपाळ शिक्षण प्रसारक मंडळ, कोल्हापूर संचालित प्रा.म.र.स्कूल, बुरुड गल्ली, शनिवार पेठ, कोल्हापूर या शाळेचे, कसबा बीड, ता.करवीर, जि.कोल्हापूर येथे स्थलांतराबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्राशास्थ ३२२०/प्र.क्र.४४८/एसएम-१**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ३० नोव्हेंबर, २०२१

**वाचा :**

शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांक : माशास्थ ३३२१/(४०१/२१) एसएम-१, दिनांक २८ जुलै, २०२१.

**संदर्भ :**

विभागीय शिक्षण उपसंचालक, कोल्हापूर विभाग कोल्हापूर यांचे क्र.प्राथ-१/ शिउस/ स्थलांतर/ १९/२७४५८-६०, दिनांक ३०.११.२०१९ चे पत्र

**प्रस्तावना :-**

कै.श्री.शंकरराव संकपाळ शिक्षण प्रसारक मंडळ, कोल्हापूर संचालित प्रा.म.र.स्कूल, बुरुड गल्ली, शनिवार पेठ, कोल्हापूर या मराठी माध्यमाच्या अनुदानित प्राथमिक (इयत्ता १ ली ते ७ वी ) शाळेचे, कसबा बीड, ता.करवीर, जि.कोल्हापूर येथे स्थलांतर करण्याचा संदर्भाधीन पत्रान्वये प्राप्त झालेला प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त प्राथमिक शाळेची इमारत जीर्ण व धोकादायक असल्याने, स्थलांतर प्रस्तावित केले आहे. सबब सदर प्राथमिक शाळेचे वर नमूद ठिकाणी स्थलांतर करण्यास खालील अटी व शर्तीवर मान्यता देण्यात येत आहे.:-

(१) स्थलांतरीत शाळेची किमान पटसंख्येची अट कोणत्याही कारणास्तव शिथिल केली जाणार नाही. तसेच सर्व विद्यार्थ्यांना स्थलांतराच्या ठिकाणी सामावून घेणे आवश्यक राहील.

(२) शासनाकडून शाळा, शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी, वेतन/वेतनेतर अनुदान, विद्यार्थी इ.संदर्भात वेळोवेळी विहित करण्यात येणारे अधिनियम, नियम, आदेश इ.चे पालन संस्थेने करणे आवश्यक राहील.

(३) शाळेच्या बाबतीत मुळ शासन परवानगीच्या व मान्यतेच्या कोणत्याही अटी व शर्तीमध्ये बदल होणार नाहीत.

(४) सदर शाळा मुळ ठिकाणी अनुदानाच्या ज्या तत्वावर कार्यरत होती, त्याच तत्वावर स्थलांतरीत ठिकाणी कार्यरत राहील.

(५) सदर स्थलांतरासंदर्भात शासनाकडे अथवा शिक्षण विभागाच्या क्षेत्रिय अधिकाऱ्यांकडे कोणत्याही प्रकारच्या तक्रारी वा आक्षेप आल्यास किंवा स्थलांतरासंदर्भातील अटींचा भंग झाल्याचे निदर्शनास आल्यास स्थलांतर रद्द करण्याचे अधिकार शासनास राहतील.

२. विभागीय शिक्षण उपसंचालक, कोल्हापूर विभाग कोल्हापूर यांनी सदर शाळेच्या स्थलांतराबाबत पुढील कार्यवाही १५ दिवसांत करावी व केलेल्या कार्यवाहीबाबत शासनास अवगत करावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१११३०१७३१४६४९२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pravin Rajaram Mundhe

Digitally signed by Pravin Rajaram Mundhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ad4976f306de2810214ec2ea330d9daea59f1d3f45fae9227a3feaa541af10d1, serialNumber=dc78036626ec580d66c0ac502d43af5f670b5ba13f51213ad071acd53714a284, cn=Pravin Rajaram Mundhe
Date: 2021.11.30 17:37:12 +05'30'

**( प्रविण मुंढे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
२. विभागीय शिक्षण उपसंचालक, कोल्हापूर विभाग कोल्हापूर.
३. शिक्षणाधिकारी (प्राथमिक ), जिल्हा परिषद, कोल्हापूर.
४. अध्यक्ष/ सचिव, कै.श्री.शंकरराव संकपाळ शिक्षण प्रसारक मंडळ, कोल्हापूर
५. निवडनस्ती (एसएम-१).